माघ शु. चतुर्थी! श्रीविनायक जन्मोत्सव!

भगवान श्री गणेशांच्या हजारो अवतारांचे वर्णन श्रीमुदगल पुराणकारांनी केलेले आहे. या प्रत्येक अवताराचे प्रयोजन मातापिता, राक्षसवध, भक्तसंरक्षण इ. लीला वेगवेगळ्या आहेत.

आपणास मात्र सामान्यत: गणेशजन्माची एकच कथा ज्ञात असते. तीच भाद्रपदी चतुर्थीला आणि तीच माघी चतुर्थीलाही सांगून आपण मोकळे होतो. वास्तविक ती कथा आहे कार्तिक शुध्द चतुर्थीची. त्या दिवशी श्रीगणेशांचा "उमांगमलज" नामक अवतार झाला. आपणास ज्ञात असलेली सर्वश्रुत कथा त्या चतुर्थीची आहे.

आज 23 जानेवारी २०१५ माघ शु. चतुर्थी. आजचा गणेशजन्म आहे श्रीविनायक जन्मोत्सव. या चतुर्थीचे वैभव हे आहे की ही या पृथ्वीची चतुर्थी आहे. महामुनी कश्यप तथा देवी अदितीच्या आश्रमात झालेला हा पृथ्वीवरील अवतार आहे.
श्रीमन मुदगल पुराणाच्या द्वितीय खंडात हे विनायक चरित्र खूप विस्तारपूर्वक वर्णिले आहे. संक्षिप्तत: त्याचा आढावा घेऊ.

गौड प्रांतात रुद्रकेतू तथा शारदा नामक दाम्पत्याला जुळी अपत्ये झाली. त्यांची देवांतक तथा नरांतक अशी नावे रूढ झाली. देवर्षी नारदांनी या दोघांना शिवपंचाक्षरी महामंत्राचा उपदेश करून तपाचरणास लावले. वरदान रुपात "श्रीब्रह्मदेव निर्मित कोणत्याही पदार्थाने मृत्यू नसावा" असा अदभुत वर मिळाला आणि मग जणू आपण अमर झालो या भावनेने त्यांची राक्षसीवृत्ती जगाला त्रस्त करू लागली.
त्रीभूवनावर सत्ता स्थापन झाली. देवता स्वलोकातून निर्वासित झाल्या. अरण्यवासी ठरल्या. मग यांनी देवता आहार रूप यज्ञाचा विनाश सुरु केला. देवतांना उपवास घडू लागले आणि त्यांच्या या दु:खाने सर्वाधिक व्यथित झाली ती देवमाता आदिती.

श्रीकश्यपांसमोर तिने आपली व्यथा मांडली आणि उत्तररुपात तिला श्रीगणेशोपासना रहस्य प्राप्त झाले. त्या आधारे तिने कठोर तपाचरण केले आणि फलरुपात श्रीगणेशदर्शन तथा पुत्ररुपात आश्रमात अवतरण्याचे त्यांचे श्रीवचन लाभले.

इकडे देवांतक नरांतक अत्याचाराने त्रस्त झालेल्या देवतांनाही अंतिम उपाय रुपात श्रीगणेशाराधन सुरु केले आणि या सगळ्यांच्या आर्ततापूर्ण हाकेला प्रतिसाद रुपात माघ शु. चतुर्थीला कश्यपगृही भगवान श्रीविनायक रुपात अवतीर्ण झाले.

या अवतारात अनेकानेक बाललीला पहावयास मिळाल्या. श्रीमुदगलपुराणापेक्षा या बाललीलांचे कौतुक श्रीगणेशपुराणाच्या क्रीडाखंडात अधिक व्यापक रीतीने शब्दबद्ध करण्यात आले आहे.
यातील अनेक लीलांचे तात्पर्यार्थ मोठे अदभुत आहेत. उदा. श्री विनायकाच्या उपनयन प्रसंगी अनेक देवतांनी त्यांना भेट रुपात शस्त्रास्त्रे दिली. वरपांगी पाहता उपनयन तर शास्त्राभ्यासाचा आरंभ. मग शस्त्रे का दिली? तर जोवर शास्त्र आणि शस्त्र यांचा समन्वय होत नाही तोवर देवांतक, नरांतक या वृत्तींचा विनाश संभव नाही.

पुराणकारांनी वर्णिलेले राक्षस या केवळ व्यक्ती नसतात तर त्या प्रवृत्ती असतात. देव कार्यास विरोध करतात ते देवांतक. तर मानवीय मूल्यांना उध्वस्त करतात ते नरांतक. यांच्या निर्दालनाकरीता शस्त्र अनिवार्य आहे. हा या कथेचा भाव समजून घेणे आणि आचरणात आणणे आवश्यक आहे.
गंधर्वकथा ही अशीच रोचक कथा. गंधर्वाचे राजे हाहा आणि हुहु हे कश्यपाश्रमात आले. बालविनायक तेथे खेळत होते. या गंधर्वांनी पंचायतन पूजा आरंभिली. श्रीगणेश, श्रीविष्णू, श्रीशंकर, श्रीदेवी तथा श्रीसूर्य या पाचही देवतांचे नियमित पूजन करण्यास पंचायतन पूजन असे म्हणतात. याचे मूळ कारण सगळ्या मार्गांचा समन्वय असते. मात्र पाचांची पूजा करतांना त्यांना वेगवेगळे मानण्यात आणि आम्ही पाचांचीही पूजा करतो याचाच अभिमान आणि पुढे जाऊन अहंकार वाटणा-या गंधर्वांना श्री विनायकाने धडा शिकवला.

श्रीविनायकांनी त्या पाचही मूर्ती गिळून टाकल्या. मग आकांडतांडव करणा-या गंधर्वांना स्वत:च

पाचही रुपात दर्शन दिले. सगळे काही "मोरयाच" आहे हे समजावून सांगणारी ही मोरया कृती आहे.
श्री विनायकांच्या लीला स्थानात कश्यपाश्रमाशिवाय काशीक्षेत्रालाही मोठे वैभवशाली स्थान आहे.

काशीराज्याच्या मुलाच्या विवाहाच्या निमित्ताने श्रीविनायक काशी नगरीत आले. तेथे त्यांनी सगळ्याच गावक-यांना लळा लावला. सगळ्यांनाच वाटू लागले की श्रीविनायक आपल्या घरी यावेत. हा आग्रह खूपच वाढला आणि मग एकेदिवशी श्रीविनायकांनी घोषित केले उद्या आम्ही सगळ्यांच्याच घरी येऊ. ही वार्ता सगळ्या गावात पोहोचली. गावाबाहेर एका झोपडीत राहणा-या महर्षी शुक्ल तथा देवी विद्रुमा नामक गरीब दाम्पत्याला ही वार्ता कळली. पण आनंदव्यक्त करावा ही व्यथा हेच कळेना. कारण प्रभू घरी येणार हा आनंद पण स्वागताला घरात फुटकी कवडीही नाही याचे दु:ख.
शेवटी आहे त्यासह स्वागताची तयारी सुरु झाली. राखेने रांगोळी, दर्भाने ध्वजा, फुलाने आसन तयार करण्यात आले. पण खायला काय देणार? शेवटी भिक्षा मागितली. मिळेल त्या सगळ्याचे पीठ करून लापसी करण्यात आली.

दुस-या दिवशी राजवैभवाने स्वागत करणा-या सगळ्यांना सोडून भगवान श्रीशुक्लांच्या झोपडीतच गेले. भगवान वैभवाचा नव्हे तर भावाचा भुकेला असतो हे सांगणारी ही कथा.

विनायक अवताराची वैभवशाली कथा आहे चतुर्थी वैभव कथनकारी श्री भृशुंडीकथा.
एके दिवशी सकाळीच काशीराजा श्रीविनायकांच्या महाली आले आणि त्यांनी जे दृश्य पाहिले त्यावर त्यांचा विश्वासच बसेना. कारण श्री विनायकांची अशा दिव्यतम उपचारांनी श्रीविनायकांची पूजा संपन्न झाली होती की जे उपचार काशिराजाला राजवाडयात सुद्धा संभव नव्हते. ही पूजा कोणी? कधी? कशी? केली असे अनेक प्रश्न राजाच्या मनात आले. राजवाडयात येऊन कोणी अशी पूजा केली कशी? आणि मग ते आपल्याला कसे कळले नाही? शेवटी काशीराजाने श्रीविनायकांनाच प्रश्न केला. उत्तर रुपात महान गाणपत्य महर्षी श्रीभृशुंडींचे महात्म्य कळले.

राजाने त्यांच्या दर्शनाची अपेक्षा व्यक्त केली. विनायककृपेने राजा अमलाश्रमात (नामलगाव जि. बीड) पोहोचला आणि त्याच्या आश्र्चर्यास पारावार उरला नाही.
भक्त भगवदरुप होते. महर्षींच्या भ्रुमध्यातून सोंडच फुटली होती. त्यांचे नावच होते महर्षी भृशुंडी. जगातील हे एकमेव उदाहरण.

राजाने आपल्या येण्याचा उद्देश सांगितला. महर्षी भृशुंडींनी केलेली मानसपूजा विनायकास प्रत्यक्षरुपात पोहोचल्याचे सांगितले तथा दर्शनार्थ येण्याची प्रार्थना केली.
आश्चर्याचा आणखी एक धक्का तेव्हा बसला जेव्हा महर्षींनी विचारले विनायक गजशुंडाधारी आहेत का? राजा म्हणाला नाही. महर्षी म्हणाले "मग मी दर्शनार्थ येणार नाही."

महर्षी भृशुडींच्या या अत्युत्कट एक निष्ठेच्या फलरुपात श्रीविनायक आपल्या मूळ गजशुंडा रुपात नटले. भक्तीमार्गातील या एकनिष्ठेला अधोरेखित करणारा अवतार आहे श्रीविनायक अवतार.
श्रीविनायक अवतारातील एक वैशिष्ठयपूर्ण कथाभाग म्हणजे देवी सिद्धीच्या अधिपत्याखाली स्थापित स्त्री सैन्य. नारी सैन्याचा हा कदाचित जगातील प्रथम प्रयोग असावा.

श्रीविनायक अवतारातील अंतिम कथा अवतरणकारण रूप लीला म्हणजे देवांतक नरांतक वध. अशा रुपात आपल्या या अवतारातील विविध लीला संपन्न करून श्रीगणराजप्रभू आपल्या स्वानंद लोकी परतले. अशा या दिव्यस्वरूपातील कृतीयुगीन अवताराची अवतरण तिथी आहे माघ. शु. चतुर्थी.

सविस्तर कथाभागार्थ पहावे
१) श्रीमुदगल पुराण खंड २
२) श्रीगणेश पुराण क्रीडाखंड
३) श्री गणराज युगावतार

जय गणेश!